**वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेचा सन २०१४-१५ करिता चालू बाब प्रस्ताव. (४४०६-००५३).**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय पत्र क्रमांक :- एस-१०/२०१४/प्र.क्र.२०६/फ-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ३० मार्च, २०१५.

<u>वाचा</u> :-

१) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/ चाबाप्र/प्र.क्र.४०/(१४-१५)/३९९. दिनांक ९ जून, २०१४.
२) शासन निर्णय समक्रमांक दि. २०.०९.२०१४, दि. ३१.१.२०१५ व दि. १२.२.२०१५.
३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि. १.०७.२०१४.
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.पुरक-२०१४/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३ , दि.१.१.२०१५.
५) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र२०१३-अंदाज./प्र.क्र.८५/अर्थ-३, दि. २.१.२०१५.
६) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज२०१३-/प्र.क्र.८५/ अर्थ-३, दि.९.२.२०१५.

**<u>प्रस्तावना :</u>**

वनहद्दीचे सर्व्हेक्षण व सिमांकन करुन कायमस्वरुपी हद्दीची निशाणे रोवून घेणे आवश्यक आहे. संरक्षित वने, अवर्गीकृत वनांचे सर्व्हेक्षण व सिमांकन पूर्णपणे झालेले नाही. काही ठिकाणी राखीव वनांची सीमा व्यवस्थित नाही. त्यामुळे वनजमीनीवर अतिक्रमण होण्याची शक्यता नाकारता येत नाही. कायमस्वरुपी हद्दीचे निशाणे रोवून घेतल्यानंतर वनजमीनीचे व्यवस्थापन, परिरक्षण करणे सुलभ होईल व पुढे अतिक्रमण होणार नाही.

सन २०१४-१५ करीता वनांचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन यासंदर्भात उपशिर्ष (४४०६-००५३) योजनांतर्गत रु. २५.०० लक्ष रकमेचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भाकित क्र.१ च्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :**

सन २०१४-१५ करिता वार्षिक योजनेतील राज्ययोजने अंतर्गत “सर्व्हेक्षण जमाबंदी व वनाचे सिमांकन यासंदर्भात उपशिर्ष (४४०६-००५३) या योजने साठी रु. २५.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला होता. तद्नंतर सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाच्या सुधारित अंदाजाच्या मर्यादेप्रमाणे सदर योजनेकरिता रु. २६.०० लक्ष निधी निश्चिच करण्यात आला आहे.

प्रस्तुत प्रकरणी नियतव्यय अर्थ संकल्पित रु. २५.०० लक्ष निधी पैकी शासन निर्णय दिनांक २०.९.२०१४ अन्वये रु.१०.५० लक्ष, शासन निर्णय दिनांक ३१.१.२०१५ अन्वये रु. ४.५० लक्ष व शासन निर्णय दिनांक १२.२.२०१५ अन्वये ३.७५ लक्ष असा एकूण रु. १८.७५ लक्ष (७५%) इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे.

तेव्हा सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाच्या सुधारित अंदाजाच्या मर्यादेप्रमाणे सदर योजनेकरिता निश्चित करण्यात आलेल्या रु. २६.०० लक्ष निधी पैकी रु. १८.७५ लक्ष निधी वितरित करण्यात आला असून उर्वरीत म्हणजे रु. ७.२५ लक्ष (०२ मजूरी रु. ५,५८,२५०/- व २७ लहान बांधकामे रु. १,६६,७५०/-) निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर खर्च हा मागणी क्रमांक-सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च राज्य योजनांतर्गत योजना वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (४४०६-००५३) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१४-१५ मध्ये मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५/५/२००९ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन तसेच वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.१२८/१५/व्यय-१०, दिनांक २४.३.२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३३१११११५३८४८१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: CN = TIWARI VIRENDRA RAMBAHAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST,CID - 917243
Date: 2015.03.31 11:26:00 +05'30'

**(वीरेंद्र तिवारी)**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

प्रत :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर

४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नाशिक.

५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.

६) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख), पनवेल.

७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महा. राज्य, मुंबई / नागपूर.

८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

९) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

१०) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

११) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.